उपजिल्हाधिकारी संवर्गातील ३९ व तहसीलदार संवर्गातील ७४ परिविक्षाधीन उमेदवारांच्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०२२/प्र.क्र.०२/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ मार्च, २०२४.

**संदर्भ**:- १) वित्त विभाग, शासन निर्णय, पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०/०२/२०१६.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.टिआरएन-०५१६/प्र.क्र.८४/१२ अ, दिनांक २०/१/२०१४

३) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/ सीपीटीपी-अ,दिनांक २४/१२/२०२१.

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक ईएसटी-२०२२/प्र.क्र.०२/ई-८,दि.१३/०१/२०२२

५) सामान्य प्रशासन विभाग,पत्र क्र. टिआरएन-२०२४/प्र.क्र.०५/प्रशि-२,दिनांक १८/०१/२०२४

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ संवर्गातील उमेदवारांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येते. राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या राज्यसेवा परीक्षा-२०१९ द्वारे सरळसेवेने नियुक्त झालेल्या गट -अ॰ संवर्गातील ३९ परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व ७४ तहसिलदार अशा एकूण ११३ परिविक्षाधीन उमेदवारांना उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये दि.१७/०१/२०२२ ते दि.१६/०१/२०२४ या दोन वर्षाच्या कालावधीकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली होती. सदर प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यासाठी सेवाज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत परिविक्षाधीन अधिकारी सध्या ज्या ठिकाणी जिल्हा संलग्नतेचे प्रशिक्षण घेत आहेत, त्या ठिकाणी त्यांना कार्यरत ठेवून उपजिल्हाधिकारी व तहसिलदार “गट-अ” संवर्गातील ११३ परिविक्षाधीन उमेदवारांचे वेतन अदा करण्यासाठी अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ च्या अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या व सामान्य प्रशासन विभागाने प्रशिक्षणांतर्गत कार्यक्रमासाठी नियुक्त केलेल्या “गट-अ” या संवर्गातील ३९ परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व ७४ परिविक्षाधीन तहसिलदार, अशी एकूण ११३ अधिसंख्य पदे दि.१७/०१/२०२२ ते दि.१६/०१/२०२४ या दोन वर्षाच्या कालावधीकरीता निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात आली होती.

आता, सदर प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांसाठी सेवाज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत परिविक्षाधीन अधिकारी सध्या ज्या ठिकाणी जिल्हा संलग्नतेचे प्रशिक्षण घेत आहेत, त्या ठिकाणी त्यांना कार्यरत ठेवून सदरहू ३९ परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी यांच्या अधिसंख्य पदांना दिनांक १७/०१/२०२४ ते

दि.१४/०३/२०२४ या कालावधीकरीता व ७४ परिविक्षाधीन तहसिलदार यांच्या अधिसंख्य पदांना दिनांक १७/०१/२०२४ ते दिनांक ३०/०६/२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू परिविक्षाधीन ३९ उपजिल्हाधिकारी व ७४ परिविक्षाधीन तहसिलदार, अशी एकूण ११३ अधिसंख्य पदांचा उपरोक्त कालावधीतील त्यांचा वेतनावरील होणारा खर्च परिविक्षाधीन उमेदवार जिल्हानिहाय प्रशिक्षणासाठी वर्ग केलेल्या जिल्ह्याकरिता "मागणी क्र. सी-१, २०५३- जिल्हा प्रशासन (००)(०९३) जिल्हा आस्थापना (०१) सर्व साधारण आस्थापना (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८)/ आयुक्त नाशिक (२०५३ ००४६)/आयुक्त पुणे (२०५३ ००६४)/ आयुक्त अमरावती (२०५३ ००८२)/ आयुक्त नागपूर(२०५३०१०८)/आयुक्त छत्रपती संभाजीनगर (२०५३ ०१२६) या लेखाशिर्षाखालील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि- २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०/०२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२६१२३०३०८८१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHRIRAM DATTATRAYA YADAV

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50CB0CE4CC4FE54C74F42B860354E86EC00B3B36F5F215C9F7658E611006A200, cn=SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2024.03.26 12:53:17 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त(सर्व)
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे.
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंपाजवळ, अमरावती रोड, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी,(सर्व)
८. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई - ३२.
१०. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग ( सीपीटीपी-ब), मंत्रालय, मुंबई - ३२.
११. सह सचिव / उप सचिव (कार्यासन ब-१/ ई-९) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
१२.निवड नस्ती, (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.